शिरापूर उपसा सिंचन योजना जि. सोलापूर प्रकल्पाच्या योजनेस रुपये ४७४.५१ कोटी इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक: शिरापूर ०३११/प्र.क्र. २३०/२०११/मोप्र-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- १९/०७/२०१८

**संदर्भ**:-.म.कृ.खो.वि.म. यांचा निर्णय क्र. शिरापूर उसियो /२९६/(१४६/९६) प्रशा-२,दि.१०.१०.१९९६

**प्रस्तावना :**

शिरापूर उपसा सिंचन योजना, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत अवर्षणप्रवण भागातील असून या योजनेअंतर्गत सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यातील शिरापूर गावाजवळ सीना नदीवरील अस्तित्वातील को.प. बंधा-यामधून दोन टप्प्यामध्ये पाणी उपसा करण्यात येणार आहे. सदर प्रकल्प कृष्णा खोऱ्यात स्थित आहे. सदर प्रकल्पामुळे सोलापूर जिल्ह्यातील उत्तर सोलापूर तालुक्यातील १७ गावे व उस्मानाबाद जिल्ह्यातील तुळजापूर तालुक्यातील २ गावे अशा एकुण १९ अवर्षणप्रवण गांवातील १०,००० हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे.

सदर प्रकल्पास संदर्भीय आदेशानुसार सन १९९५-९६ चे दरसुचीवर आधारित रु. ९०.५७ कोटीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

राज्य तांत्रिक सल्लागार समिती (SLTAC-२) ने १२ व्या बैठकीमध्ये शिरापूर उपसा सिंचन योजना जि. सोलापूर या प्रकल्पाचा रु. ४७४.५१ कोटी किंमतीचा प्रथम सुधारीत प्रकल्प अहवाल अंतीम केला आहे.

प्रशासकीय मान्यतेनंतर प्रामुख्याने दरसुचीत वाढ झाल्याने, भूसंपादन खर्चात वाढ झालेने, तसेच संकल्पनातील बदल व मूळ प्रकल्प अहवालातील अपु-या तरतुदी यामुळे प्रकल्प किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाने प्रथम सुधारीत प्रकल्प अहवाल मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. या प्रकल्प अहवालास राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ यांनी बाराव्या बैठकीमध्ये शिफारस केली आहे. तसेच प्रकल्प अहवालावर दि. २३/४/२०१८ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीचे बैठकीत चर्चा झाली आहे.

व्यय अग्रक्रम समितीने वाढीची कारणमिमांसा, राज्य तांत्रिक सल्लागार समितीचा अहवाल, व्यय अग्रक्रम समितीची निरिक्षणे तसेच प्रकल्पातील कामाच्या अनुषंगाने, सोलापूर जिल्हयातील मोहोळ तालुक्याला वरदान ठरणा-या शिरापूर उपसा सिंचन योजनेचे काम पूर्णत्वास नेण्याच्या उद्देशाने, सन २०१३-१४ च्या दरसुचीवर आधारीत रुपये ४७४.५१ कोटी इतक्या किंमतीच्या प्रथम सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

शिरापूर उपसा सिंचन योजना जि. सोलापूर या प्रकल्पाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०१३-१४ च्या दरसुचीवर आधारीत रुपये ४७४.५१ कोटी (रुपये चारशे चौ-याहत्तर कोटी एक्कावन्न लक्ष फक्त) इतक्या किंमतीस प्रत्यक्ष कामासाठी रुपये ३५५.१५ कोटी (रुपये तीनशे पंच्चावन्न कोटी पंधरा लक्ष फक्त), व अनुषंगीक खर्चासाठी ४९.२६ कोटी (रुपये एकोण पन्नास कोटी सव्वीस लक्ष फक्त ) तसेच भीमा-सीना जोड कालव्याची शिरापूर उसिंयोवर पाणीवापराच्या प्रमाणात वर्ग होणारी रक्कमेसाठी रु. ७०.१० कोटी (रुपये सत्तर कोटी दहा लक्ष फक्त ) खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदीचा गोषवारा सोबत जोडला आहे.

१. भूसंपादनाच्या खर्चामध्ये ३० टक्के कपात करण्यात यावी.
२. शिरापूर उपसा सिंचन योजनेची कामे दोन वर्षात पूर्ण करावीत तसेच सदरचा प्रस्ताव सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी पुन्हा येणार नाही, आल्यास संबंधीत अधिकाऱ्यांवर कारवाई करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.
३. भूसंपादन प्रकरणांचे दायित्व, वितरण व्यवस्थेची कामे व महत्तम सिंचन निर्मिती करण्यासाठी प्राधान्याने निधीचा विनियोग करावा.
४. प्रचलीत शासन धोरणानुसार तांत्रिक दृष्टया शक्य तेथे बंदीस्त नलिका प्रणालीचा वापर करावा जेणेकरुन भूसंपादनावरील खर्चात बचत होईल.
५. कालव्याची व वितरणव्यवस्थेची कामे सलगतेने करावीत व सिंचन उदिष्ट साध्य करावे.
६. पुर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणी वापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणी वापर संस्थेस हस्तांतरित करावे.
७. सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयीकरनाचे विविध टप्प्यावर क्षेत्रिय अधिका-यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती आहे, असे गृहीत धरता येणार नाही.

प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदीचा गोषवारा सोबत जोडला आहे.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (८०)सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०२) योजनांतर्गत, (०२) (०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरित महाराष्ट्र) (संगणक संकेतांक ४७०१ एच-६२९) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय दिनांक २३/०४/२०१८ रोजी व्यय अग्रक्रम समितीने घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७१९१६०३३१५९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2018.07.19 16:05:24 +05'30'

**(श.शं. दाभाडकर)**
**शासनाचे अवर सचिव**

सहपत्र: परिशिष्ट “अ”

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.

## परिशिष्ट “अ”
## शिरापूर उपसा सिंचन योजना
## किंमतीचा उपशीर्ष निहाय गोषवारा

| अ. क्र. | उपशिर्ष | मंजूर प्र.मा नुसार तरतुद | प्रस्तावित प्रथम सु.प्र.मा. नुसार तरतूद | वाढ / घट (+ /-) | मार्च-२०१६अखेर झालेला खर्च | उर्वरीत किंमत |
|---|---|---|---|---|---|---|
| A) शिर्षकामे | | | | | | |
| १ | ए-प्राथमिक | ०.०२ | ०.२१ | ०.१९ | ०.२१ | ०.०० |
| २ | बी- भुसंपादन | ०.०१ | २.९७ | २.९६ | ०.७५ | २.२२ |
| ३ | सी-कामे | २५.८५ | ७१.५२ | ४५.६७ | ६४.९६ | ६.५६ |
| ४ | के-इमारती | ०.०० | ०.०४ | ०.०४ | ०.०४ | ०.०० |
| ५ | एम-वृक्षारोपण | ०.०००१ | ०.१० | ०.१० | ०.०० | ०.१० |
| ६ | ओ-संकीर्ण | ०.०४ | ०.११ | ०.०७ | ०.०३ | ०.०८ |
| ७ | पी-देखभाल दुरूस्ती | ०.०३ | ०.७२ | ०.६९ | ०.०० | ०.७२ |
| ८ | क्यु -स्पेशल टी &पी | ०.३० | ०.०७ | -०.२३ | ०.०० | ०.०७ |
| ९ | आर-दळणवळण | ०.१० | ०.३५ | ०.२५ | ०.३५ | ०.०० |
| १० | एक्स-पर्यावरण | ०.०० | १०.०५ | १०.०५ | ०.०५ | १०.०० |
| | **एकूण (A)** | **२६.३५** | **८६.१४** | **५९.७८** | **६६.३९** | **१९.७५** |
| B) कालवे व वितरण व्यवस्था | | | | | | |
| १ | ए-प्राथमिक | ०.०२ | ०.०७ | ०.०५ | ०.०७ | ०.०० |
| २ | बी- भुसंपादन | ०.२० | ११०.९७ | ११०.७७ | २.०१ | १०८.९६ |
| ३ | सी-कामे | ४.६० | ६.०८ | १.४८ | ६.०८ | ०.०० |
| ४ | डी- रेग्युलेटर | ०.०६ | २.३६ | २.३० | ०.६४ | १.७२ |
| ५ | ई-प्रपात | ०.०० | ०.१२ | ०.१२ | ०.०० | ०.१२ |
| ६ | एफ़-आर.एच.टी. | २.५० | ९.७८ | ७.२८ | २.१६ | ७.६३ |
| ७ | जी-ब्रिजेस | ०.२१ | ६.३६ | ६.१५ | १.३३ | ५.०३ |
| ८ | एच-एस्केप | ०.०१ | ०.४० | ०.३९ | ०.०९ | ०.३१ |
| ९ | एल-मातीकामे | ७.४७ | १७.९६ | १०.४८ | ७.११ | १०.८५ |
| १० | एम-वृक्षारोपण | ०.१५ | १.०७ | ०.९३ | ०.०० | १.०७ |
| ११ | ओ-संकीर्ण | ०.०२ | ०.१७ | ०.१६ | ०.०२ | ०.१५ |
| १२ | पी-देखभाल दुरूस्ती | ०.०२ | १.६० | १.५९ | ०.०० | १.६० |
| १३ | क्यु-स्पेशल टी & पी | ०.१६ | ०.०० | -०.१६ | ०.०० | ०.०० |
| १४ | आर- दळणवळण | ०.०७ | ०.२० | ०.१३ | ०.०० | ०.२० |
| १५ | यु-वितरीका | ३.७० | ८३.०३ | ७९.३३ | ०.४५ | ८२.५७ |
| १६ | व्ही- शेतचारी | ०.६५ | १८.८९ | १८.२४ | ०.०० | १८.८९ |
| १७ | डब्ल्यु- निचराचारी | ०.१५ | १०.०० | ९.८५ | ०.०० | १०.०० |
| | **एकूण (B)** | **१९.९९** | **२६९.०१** | **२४९.०३** | **१९.९६** | **२४९.०५** |
| | **एकूण कामे (A+B)** | **४६.३४** | **३५५.१५** | **३०८.८१** | **८६.३६** | **२६८.७९** |
| C | आस्थापना, अनुषंगिक व इतर | ११.५१ | ४९.२६ | ३७.७५ | १०.१७ | ३९.०९ |
| D | भीमा-सीना जोड काल-व्याची शिरापूर उसिंयोवर पाणीवापराच्या प्रमाणात वर्ग होणारी रक्कम | ३२.७२ | ७०.१० | ३७.३९ | ५२.९५ | १७.१६ |
| **एकूण (A+B+C+D)** | | **९०.५७** | **४७४.५१** | **३८३.९५** | **१४९.४७** | **३२५.०४** |

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2018.07.19 16:05:35 +05'30'

**(श.शं. दाभाडकर)**

**शासनाचे अवर सचिव**